**कोव्हिड-१९ संबंधित कर्तव्य बजावत असताना कोरोना विषाणूचा संसर्ग होऊन मृत्यू पावलेल्या कर्मचाऱ्यांच्या कुटूंबियांना विमा कवच/सानुग्रह सहाय्य मंजूर करण्याबाबत.**
**कै. (श्री.) असलम निजाम महाब्री, उप शिक्षक**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन ज्ञापन क्रमांक : सहाय्य-२०२३/प्र.क्र.१०१/टीएनटी-६**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई -४०० ०३२
दिनांक : १२ मार्च, २०२४

**संदर्भ** :-

१) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण २०२०/प्र.क्र.४/व्यय-९, दिनांक २९.०५.२०२०, दिनांक. १४.१०.२०२० व दिनांक १४.०५.२०२१
२) शालेय शिक्षण व क्रीडा विभागाचे क्रमांक: सहाय्य-२०२०/प्र.क्र.८१/टीएनटी-६, दिनांक ०७.१२.२०२० व दिनांक १६.०३.२०२१ चे पत्र.
३) मुख्य कार्यकारी अधिकारी, जि. प. सांगली यांचे पत्र क्र.जिपसां/प्राशिवि/आस्था-१/वशी/८२५६/२०२२, दि.२३/०५/२०२२
४) शिक्षण संचालक (प्राथमिक) यांचे पत्र क्र.प्राशिसं/८०२/संकीर्ण/९४०२/२०२३ दिनांक १५/१२/२०२३.

**ज्ञापन** :-

कै. (श्री.) असलम निजाम महाब्री, उप शिक्षक, जिल्हा परिषद, प्राथमिक शाळा, चोपडेवाडी, ता.पलूस जि.सांगली यांचा कोव्हिड-१९ संबंधित कर्तव्य बजावताना कोव्हिड-१९ मुळे दिनांक २२/०५/२०२१ रोजी मृत्यू झालेला आहे.

२. कै.(श्री.) महाब्री, यांच्या वारसास वित्त विभागाच्या संदर्भ क्र. (१) येथील दिनांक २९.०५.२०२० च्या शासन निर्णयानुसार रु.५०.०० लक्ष रकमेचे सानुग्रह सहाय्य देण्याबाबतचा प्रस्ताव शिक्षण संचालक (प्राथमिक), पुणे यांनी संदर्भ क्र. (४) येथील पत्रान्वये सादर केला आहे. तसेच मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प. सांगली यांनी संदर्भ क्र. (३) येथील पत्रान्वये शिफारस केली आहे.

३. गट विकास अधिकारी, वर्ग-१ पंचायत समिती, पलूस , गट शिक्षणाधिकारी, पंचायत समिती, पलूस व केंद्र प्रमुख, केंद्र शाळा, भिलवडी यांच्या दिनांक ८/०४/२०२१ रोजीच्या संयुक्त आदेशान्वये कोरोनावरील उपाययोजनेसाठी प्राथमिक आरोग्य केंद्र, भिलवडी येथे लसीकरण कक्ष स्थापन करण्याबाबत आदेशित करण्यात आले होते. सदर आदेशानुसार कै.(श्री.) महाब्री यांची प्राथमिक आरोग्य केंद्र, भिलवडी ता. पलूस जि. सांगली येथे लसीकरण कक्षात दि.०९/०४/२०२१ रोजी नियुक्ती करण्यात आली. उक्त दिनांक ०८/०४/२०२१ च्या आदेशान्व्ये कै.(श्री.) महाब्री हे

कोरोना-१९ लसीकरण कामकाजाकरिता दिनांक १२/०४/२०२१ रोजी प्राथमिक केंद्र, भिलवडी येथे उपस्थित होते व ते इस्पितळात दाखल होण्याच्या दिनांकापूर्वी १४ दिवसाच्या काळात कर्तव्यावर हजर असल्याबाबतचे गटविकास अधिकारी (वर्ग-१), पंचायत समिती पलूस यांनी प्रमाणित केले आहे.

४. कै. (श्री.) महाब्री यांची दि. २३/०४/२०२१ रोजी केलेली कोव्हिड-१९ चाचणी पॉझिटिव्ह आली. कै. (श्री.) महाब्री यांचे दि. २३/०४/२०२१ ते दि. ११/०५/२०२१ या कालावधीत स्पंदन हॉस्पीटल, आष्टा, ता.वाळवा जि. सांगली येथे कोव्हिड-१९ वर उपचार करण्यात आले. पुढील उपचारासाठी दि.११/०५/२०२१ रोजी सदर इस्पितळातून डिस्चार्ज देण्यात आला. पुढील उपचार दिनांक ११/०५/२०२१ ते २२/०५/२०२१ या कालावधीत सिध्दीविनायक नर्सिंग होम, कोल्हापूर येथे करण्यात आले. उपचारा दरम्यान दिनांक २२/०५/२०२१ रोजी कोव्हिड-१९ लागण होऊन मृत्यु झाल्याचे वैद्यकीय प्रमाणपत्र फॉर्म क्र. ४ द्वारे वैद्यकीय अधिक्षक, सिध्दीविनायक नर्सिंग होम, कोल्हापूर यांनी प्रमाणित केले आहे.

५. कै. (श्री.) महाब्री यांचा दिनांक २२/०५/२०२१ रोजी मृत्यु झाल्याबाबतचे मृत्यु प्रमाणपत्र निबंधक (जन्म व मृत्यु), महानगरपालिका, कोल्हापूर यांचे दि.११/०६/२०२१ रोजीचे प्रमाणपत्र सादर करण्यात आले आहे.

६. कै. (श्री.) महाब्री यांच्या पत्नी श्रीमती शमा असलम महाब्री यांनी त्यांच्या पतीला देय असणारी कोव्हिड-१९ विमा कवच मधील रक्कम मिळण्याबाबत दि.११/०६/२०२१ रोजीच्या निवेदनाद्वारे विनंती केली आहे.

७. कै.(श्री.) असलम निजाम महाब्री, उप शिक्षक, जिल्हा परिषद, प्राथमिक शाळा, चोपडेवाडी, ता.पलूस जि.सांगली यांना २२०२-०१७३ या लेखशिर्षातून मासिक वेतन अदा करण्यात येत असल्याचे शिक्षणाधिकारी (प्राथमिक), जिल्हा परिषद, सांगली यांनी प्रमाणित केले आहे.

८. गटविकास अधिकारी (वर्ग-१), पंचायत समिती पलूस, जि. सांगली व वैद्यकीय अधिक्षक, सिध्दीविनायक नर्सिंग होम, कोल्हापूर यांनी प्रमाणित केल्यानुसार तसेच, मा. सह दिवाणी न्यायाधिश कनिष्ठ स्तर, इस्लामपूर, जि. सांगली यांनी कै. (श्री.) महाब्री यांचे कायदेशिर वारस म्हणून (१) श्रीमती शमा अस्लम महाब्री (पत्नी) (२) श्री. आसिफ अस्लम महाब्री (मुलगा), (३) श्री. अरबाज अस्लम महाब्री (मुलगा),यांना घोषित केल्यानुसार यांना एकत्रित रु.५० लक्ष (रुपये पन्नास लक्ष फक्त ) इतक्या रकमेचे सर्वकष वैयक्तिक अपघात विमा कवच /सानुग्रह सहाय्य प्रदान करण्यास वित्त विभागाच्या दिनांक २९/०५/२०२० च्या शासन निर्णयानुसार याद्वारे मंजूरी देण्यात येत आहे.

९. प्रस्तुत प्रस्तावावरील खर्च वित्त विभागाच्या अभिप्रायानुसार तसेच त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३८०/२०२२/व्यय ९, दिनांक ०५/१२/२०२२ अन्वये खाली नमूद लेखाशीर्षाखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात येईल.

"मागणी क्रमांक ई-२, २२०२ सर्वसाधारण शिक्षण, (०१) प्राथमिक शिक्षण, १९६, जिल्हा परिषदांना सहाय्य, (०१) प्राथमिक शिक्षणासाठी जिल्हा परिषदांना सहाय्य, (०१) (०१) महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम, १९६१ यांच्या कलम १८२ अन्वये जिल्हा परिषदांना सप्रयोजन अनुदाने, (२२०२ ०१७३)/३१-सहायक अनुदान-वेतनेतर."

१०. सदर शासन ज्ञापन, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून, त्याचा संकेतांक २०२४०३१२१७४९२९२०२१ असा आहे. हा शासन ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने सांक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

TUSHAR VASANT MAHAJAN

Digitally signed by TUSHAR VASANT MAHAJAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=19c6c23f510a80926e9b7ee5db235979452f3f9e89181186340 69a6cc7a22b9f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1A39CEF3C157B9EE6A2ABE5779ACF233682613F7B9C3 35D6BF4877267695CECA, cn=TUSHAR VASANT MAHAJAN
Date: 2024.03.12 17:59:47 +05'30'

**( तुषार महाजन )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत, माहिती व आवश्यक कार्यवाहीकरीता :-**

१. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
२. शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
३. शिक्षण उपसंचालक, कोल्हापूर विभाग, कोल्हापूर
४. जिल्हा कोषागार अधिकारी, सांगली
५. अधिक्षक, वेतन व भविष्य निर्वाह निधी पथक, (प्राथमिक), सांगली

**प्रत माहितीसाठी :-**

१. वित्त विभाग (व्यय-९)/(व्यय-५), मंत्रालय, मुंबई
२. कक्ष अधिकारी/अवर सचिव (एस एम ४)/अर्थसंकल्प, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
३. श्रीमती शामा अस्लम महाब्री, रा.आष्टा, वडगाव रस्ता, दत्त वसाहत आष्टा ता.वाळवा जि.सांगली, पीन- ४१६३०१
४. निवड नस्ती (टीएनटी-६) (प्र.क्र. १०१/२०२३)